**राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा २०२२-२३ या वर्षाकरिता राज्यस्तरावरील विजेत्या कार्यालय व अधिकारी/कर्मचारी यांना पारितोषिक वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रागांअ-११२२/प्र.क्र.६४/१८अ,**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १९ एप्रिल, २०२३

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, रागांअ १११९/प्र.क्र.०३/१८-अ, दि. ३.२.२०२१

२) शासन निर्णय क्रमांक: सामान्य प्रशासन विभाग, रागांअ ११२२/प्र.क्र.६४/१८-अ दि.२३.०३.२०२३

<u>प्रस्तावना</u> :-

प्रशासनातील सेवांच्या गुणवत्तेमधील वाढ (Service quality improvement), लोकाभिमुखता (Citizen Centricity) व निर्णयक्षमता आणण्याकरिता तसेच सर्वांच्या सहकार्यातून उत्तम प्रशासन कार्यान्वीत करण्याकरिता "राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा" ही योजना शासन निर्णय दि.३.२.२०२१ अन्वये राबविण्यात येत आहे. या अभियानातंर्गत सहभाग घेऊन स्पर्धेत सर्वोत्तम कामगिरी केलेली कार्यालये व सर्वोकृष्ट कल्पना/उपक्रम सुचविणाऱ्या शासकीय संस्था, अधिकारी व कर्मचारी यांना पारितोषिके वितरीत करण्यात येणार आहेत. राज्य स्तरावर प्रशासकीय गतिमानता अंतर्गत चार वर्गवारीत प्रत्येकी प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकांसाठी अनुक्रमे रु.१०.०० लाख, रु. ६.०० लाख व रु. ४.०० लाख इतक्या रकमेची एकूण १२ पारितोषिके वितरीत करण्यात येतात. तसेच सर्वोत्कृष्ट कल्पना/ उपक्रम सुचविणाऱ्या शासकीय संस्था, अधिकारी व कर्मचारी यांना अनुक्रमे प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकांसाठी अनुक्रमे रु.५० हजार, रु. ३० हजार व रु. २० हजार इतक्या रकमेची तीन वर्गवारीत एकूण ९ पारितोषिके वितरीत करण्यात येतात.

२. सन २०२१-२२ या वर्षापासून राज्यात तालुका, जिल्हा, विभाग व राज्यस्तरावर "राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा" चे आयोजन करण्यात आले असून या अभियानाच्या अनुषंगाने स्पर्धेचे प्रस्ताव सादर करणेसाठी पंतप्रधान पारितोषिक योजनेच्या धर्तीवर ऑनलाईन पोर्टल विकसित करण्यात आले आहे. स्पर्धेसाठी सर्व स्तरावरुन ऑनलाईन प्रस्ताव प्राप्त झाले आहेत. तालुका, जिल्हा, विभाग स्तरावरील प्रस्तावांची छाननी पूर्ण झाली असून या स्तरावरील पारितोषिके वितरीत करण्यासाठी त्या त्या स्तरावर कार्यक्रमांचे आयोजन करण्यात येणार आहे. या अभियानातंर्गत राज्यस्तरावर प्राप्त प्रस्तावांची छाननी राज्यस्तरीय निवड समिती मार्फत करण्यात आली असून सन २०२२-२०२३ करिता अंतिम पारितोषिक विजेत्यांची निवड करण्यात आली आहे.

३. राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा याकरिता राज्यस्तरावर प्राप्त प्रस्तावांची छाननी करुन अंतिम निवड करण्याकरिता मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आलेली आहे. या अभियानाअंतर्गत प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी करण्यात आली असून अंतिम विजेत्यांची निवड करण्यात आली आहे. दि.३.२.२०२१ च्या शासन निर्णयात केलेल्या

तरतूदीनुसार राज्य स्तरावर प्रशासकीय गतिमानता अंतर्गत १२ पारितोषिके व सर्वोत्कृष्ट कल्पना/ उपक्रम सूचविणाऱ्या शासकीय संस्था, अधिकारी, कर्मचारी यांना प्रथम तीन क्रमांकाची पारितोषिके घोषित आहेत. प्रशासकीय गतिमानता अंतर्गत प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकांसाठी अनुक्रमे रु. १०.०० लाख, ६.०० लाख व ४.०० लाख इतक्या रकमेचे पारितोषिक आहे. तसेच सर्वोत्कृष्ट कल्पना/ उपक्रम सुचविणाऱ्या शासकीय संस्था, अधिकारी, कर्मचारी यांना अनुक्रमे प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकासाठी अनुक्रमे रु.५० हजार, ३० हजार व २० हजार इतक्या रकमेचे पारितोषिक आहे.

४. संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय दिनांक २३.०३.२०२३ अन्वये सन २०२२-२३ करिता राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा अंतर्गत विजेत्यांना वितरित करावयाच्या पारितोषिक रक्कमेच्या खर्चास मान्यता देण्यात आली आहे. उक्त पार्श्वभूमीवर राजीव गांधी प्रशासकीय गतीमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा अंतर्गत सन २०२२-२३ या वर्षाकरिता राज्य स्तरावरील विजेत्यांना पारितोषिक वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या वर्षाकरिता "राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा" या अभियानांतर्गत राज्यस्तरावर प्राप्त प्रस्तावांपैकी राज्यस्तरीय स्पर्धेत प्रशासकीय गतिमानता व सर्वोत्कृष्ट कल्पना या वर्गवारीत मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय निवड समितीमार्फत पात्र व अंतिम विजेते ठरविण्यात आलेल्या स्पर्धकांना खालीलप्रमाणे त्यांच्या नावासमोर दर्शविलेली पारितोषिके वितरित करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

| पारितोषिकांचा क्रमांक | पारितोषिक प्राप्त विभाग/अधिकारी/कर्मचारी | पारितोषिकांचा तपशील | पारितोषिकांचे मुल्य |
|---|---|---|---|
| **प्रशासकीय गतिमानता:-** | | | |
| अ) मंत्रालयीन प्रशासकीय विभागांकडून येणारे प्रस्ताव :- | | | |
| निरंक | निरंक | निरंक | निरंक |
| ब)राज्यातील सर्व मुख्यालयाच्या कार्यालयातून थेट येणारे प्रस्ताव :- | | | |
| प्रथम क्रमांक | विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक | कार्यालयीन व्यवस्थापनामध्ये आधुनिक संकल्पना व व्यवस्थापन पध्दतीचा अवलंब. | १०,००,०००/- |
| क) विभागीय स्तरावरील निवड समित्यांकडून प्राप्त होणारे प्रस्ताव :- | | | |
| प्रथम क्रमांक | जिल्हाधिकारी, जळगांव | संजय गांधी निराधर योजना अनुदान घरपोच वाटप. | १०,००,०००/- |
| व्दितीय क्रमांक | जिल्हाधिकारी, मुंबई शहर | गव्हर्नमेंट टू सिटीझन G२C प्रकारचे ई गर्व्हर्नस डेटा शेअरींग ॲप लॉंच. | ६,००,०००/- |
| तृतीय क्रमांक | जिल्हा कोषागार कार्यालय, चंद्रपूर | जिल्हा कोषागार इमारतीत सौर उर्जा व वॉटर हार्वेस्टिंग पर्यावरण पूरक प्रणालीचा वापर. | ४,००,०००/- |

| | | | |
|---|---|---|---|
| ड) महानगरपालिका :- | | | |
| प्रथम क्रमांक | आयुक्त, नागपूर महानगरपालिका,नागपूर | सर्व प्रकारच्या मालमत्तांचे पद्धतशीर आणि योग्य सर्वेक्षण करण्यासाठी GeoCivic® मालमत्ता कर व्यवस्थापन प्रणाली सुरू करणे | १०,००,०००/- |
| **सर्वोकृष्ट कल्पना :-** | | | |
| अ) शासकीय संस्था :- | | | |
| प्रथम क्रमांक | जिल्हाधिकारी कार्यालय, धुळे | भूसंपादन प्रक्रियेत महाराष्ट्र रिमोट सेन्सींग ॲप्लीकेशन सेन्टर, नागपूर यांचेकडून प्राप्त उपग्रह छायाचित्रांचा वापर करणे. | ५०,०००/- |
| व्दितीय क्रमांक | महाराष्ट्र राज्य खादी ग्रामोद्योग, मुंबई | मौजे मांघर, ता.महाबळेश्वर येथे मधाचे गाव संकल्पना राबवुन गाव स्वंयपुर्ण करणे | ३०,०००/- |
| ब) शासकीय अधिकारी :- | | | |
| प्रथम क्रमांक | श्री. विकास रमेश नवाळे, मुख्याधिकारी, एरंडोल नगरपालिका,जि. जळगांव | बचतगटांना फळझाड प्रकल्पाच्या माध्यमातुन स्वयंरोजगाराचे साधन उपलब्ध करणे | ५०,०००/- |
| व्दितीय क्रमांक | श्री. पद्मनाभ शिवाजी म्हस्के, तालुका कृषी अधिकारी, कर्जत, अहमदनगर | कृषी विभागाच्या विविध योजनांची प्रभावी अंमलबजावणी MAHADBT मेळाव्याच्या माध्यमातून करणे | ३०,०००/- |
| तृतिय क्रमांक | श्री.राजीव दत्तात्रय निवतकर, जिल्हाधिकारी, मुंबई शहर | कमी कालावधीत नागरिकांना दस्तनोंदणीसाठी ना हरकत प्रमाणपत्र देणेबाबत (वेब ॲप्लीकेशन प्रणाली) | २०,०००/- |
| क) शासकीय कर्मचारी:- | | | |
| प्रथम क्रमांक | डॉ. मोहसिन युसुफ शेख, मंडल अधिकरी, तहसीलदार कार्यालय राहता, जि.अहमदनगर. | महसूल अर्धन्यायिक निकालपत्रात क्यू-आर कोडचा राज्यातील प्रथम नाविन्यपूर्ण प्रयोग) | ५०,०००/- |
| व्दितीय क्रमांक | श्री.राजू मोहन मेरड, तलाठी आणि श्रीम.वैशाली सदाशिव दळवी, मंडल अधिकारी, मणिकदौंडी, ता.पाथर्डी, जि.अहमदनगर | आदिवासी समाजासाठी आधारकार्ड, रेशनकार्ड, बँक पुस्तिका इ. प्रदान करण्यात आले आहे. | ३०,०००/- |
| तृतिय क्रमांक | श्रीमती दिपाली आंबेकर, तलाठी, तहसील कार्यालय, यवतमाळ. | वनराई बंधारक वैयक्तीक व लोकसहभागातून तयार करणे | २०,०००/- |
| **एकूण** | | | **४२,८०,०००/-** |

२. उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे पारितोषिकांसाठी एकूण रु.४८,८०,०००/-(रुपये अठ्ठेचाळीस लाख ऐंशी हजार फक्त) इतकी रक्कम संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या मान्यतेनुसार संबंधित कार्यालयांना धनादेशाद्वारे उपलब्ध करुन देण्यास मंजूरी देण्यात येत आहे. अवर सचिव, रोख शाखा, (कार्यासन २६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी उपरोक्त सर्व कार्यालयांचे धनादेश तयार करुन या कार्यालयास उपलब्ध करुन द्यावेत.

३. या अभियानातंर्गत विजेत्यांनी प्राप्त पारितोषिकाच्या रकमेचा वापर कार्यालयीन सुधारणेसाठीच करावयाचा आहे. महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमधील नमुना क्रमांक १० मध्ये खर्चाचा तपशील ठेवण्यात यावा. खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात, खर्चाची कारणे व सांक्षाकित देयकांच्या प्रतीसह धनादेश मिळाल्यापासून एक महिन्याच्या आत अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग /कार्यासन २६ व कार्यासन १८-अ, मंत्रालय मुंबई -३२ यांना सादर करण्याबाबत दक्षता घ्यावी.

४. या अभियानातंर्गत पारितोषिक प्राप्त प्रस्तावांचे/उपक्रमांचे अनुकरण अन्य विभागात/ कार्यालयात करण्यासाठी प्रस्तावांचे/उपक्रमांचे दस्तऐवजीकरण (documentation) यशदा, पुणे यांच्यामार्फत करण्यात येईल. यशदा, पुणे यांनी उपरोक्त पारितोषिक प्राप्त प्रस्तावांचे/उपक्रमांचे अनुकरण राज्यातील विभागात/कार्यालयात करण्याच्या दृष्टीने एक कार्यपध्दती सुनिश्चित करावी. यासंदर्भात केलेल्या कार्यवाहीचा अहवाल मा.मुख्य सचिव महोदयांना सादर करावा. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांच्या विभागाअंतर्गत राबविण्यात आलेल्या पारितोषिक प्राप्त प्रकल्पांची त्यांच्या स्तरावर दखल घेऊन त्याची अंमलबजावणी विभागाअंतर्गत अन्य कार्यालयात करता येईल यादृष्टीने आवश्यक कार्यवाही करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१९१५३०३३४४०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KISHOR BALIRAM NANVARE

Digitally signed by KISHOR BALIRAM NANVARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=fe999a6df0afb3cbcb04011b094c0c03933b517a839feb4c64184c7f85f5adb9, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2C5D8A2C16BC0D3779E84FEFC316A16497391C87251547B9A0338E4A70D535BD, cn=KISHOR BALIRAM NANVARE
Date: 2023.04.20 11:39:04 +05'30'

**( कि. ब. ननवरे )**

कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महासंचालक, यशदा

७. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक
८. जिल्हाधिकारी, मुंबई शहर, धुळे, जळगाव
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग, मुंबई
१०. मुख्याधिकारी, एरंडोल नगरपरिषद, जि.जळगाव
११. महापालिका आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर
१२. जिल्हा कोषागार अधिकारी कार्यालय, चंद्रपूर
१३. तहसिल कार्यालय, राहता जि.अहमदनगर
१४. तहसिल कार्यालय, पाथर्डी जि.अहमदनगर
१५. तहसिल कार्यालय, यवतमाळ जि.यवतमाळ
१६. तालुका कृषी अधिकारी कार्यालय, कर्जत, जि.अहमदनगर
१७. अपर मुख्य सचिव यांचे स्विय सहाय्यक
१८. अधिदान व लेखा अधिकारी (४ प्रती- रोख शाखेमार्फत)
१९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा)-महाराष्ट्र-१,मुंबई (प्रत्येकी २ प्रती),
२०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा)-महाराष्ट्र-२,नागपूर (प्रत्येकी २ प्रती),
२१. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, का.क्र.२६/का.क्र.२५
२२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२३. निवड नस्ती, का. १८-अ.